**मौजे इनामधामणी (२४X७), ता. मिरज, जि. सांगली या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २२१८/प्र.क्र.१४३/पापु १७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ जुलै, २०१८

वाचा -

१) शासन पत्र क्र. पापुयो २२११/प्र.क्र.२३/पापु-१७, दिनांक ३१.१२.२०११.
२) मुख्य अभियंता (नागरी ग्रामीण) म.जी.प्रा. रायगड योची मूळ तांत्रिक मान्यता क्र. मु.अ. (ना. व ग्रा.) /इनाम धामणी/तांश-१/२०११/(२२६), दि. ३१.१२.२०११
३) शासन निर्णय क्रमांक पापुयो-२२११/प्र.क्र.२२३/पापु-१७ दि. २.१.२०१२
४) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, विभाग पुणे यांचे पत्र क्र. तांशा-१/इ.धामणी/२४x७/सुधारित अंदाजपत्रके/८९८/२०१८, दि. ३१/०५/२०१८.
५) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मंडळ, सांगली यांची सुधारित तांत्रीक मान्यता क्र. तांशा-३/इ.धामणी २४x७/१४६३/२०१८, दि.२६.६.२०१८.
६) शासप पत्र क्र. पापुयो-२१४/प्र.क्र.४३/पापु-१७, दि. ७.५.२०१६ नुसार जादा दाराच्या निविदेस दिलेली मान्यता.
७) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र. मजीप्रा/सस/तांशा-२/५८८, दि.१९.५.२०१६.
८) अधिक्षक अभियंता, महराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली, यांचे पत्र दि. २६/०६/२०१८.

प्रस्तावना-

**मौजे इनामधामणी (ता. मिरज,जि.सांगली)** या गावासाठी २४X७ पध्दतीने नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.५१७.८४ लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.२ येथील शासनाच्या पत्रान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी सदर योजनेच्या कामाच्या व्याप्तीत झालेल्या बदलामुळे खर्चात वाढ झाली. **मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग**,पुणे **यांनी** संदर्भ क्र.७ येथील पत्रान्वये प्रस्तुत योजनेच्या **रु. ५४८.५० लक्ष (ढोबळ)** किंमतीच्या प्रस्ताव सुधारीत प्रशासकिय मान्यतेसाठी सादर केलेला आहे, तसेच अधिक्षक अभियंता यांनी सदर योजनेला तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

**मौजे इनामधामणी (ता. मिरज,जि.सांगली)** या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. ५,४८,५०,२२० (ढोबळ)** (**अक्षरी रुपये पाच कोटी आठ्ठेचाळीस लक्ष पंन्नास हजार दोनशे विस फक्त**) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, मिरज यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण दुरुस्त्या (विशेष दुरुत्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामग्री नुतनीकरणासाठी सबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

७. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना

आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

८. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

९. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

१०.ग्रामपंचायतीमार्फत वॉटर मीटरसाठी ५० टक्के निधी प्राप्त होईपर्यंत मीटरचे काम हाती घेण्यात येवू नये.

११.प्रत्येक लाभार्थ्याकडून मीटरसाठी घ्यावयाची रक्कम प्राप्त करुण घेण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.

१२. तांत्रिक मान्यता देतांना नमूद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालण करण्यात यावे.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. ३०,६६,५४०/- (अक्षरी रुपये तीस लक्ष सहासष्ठ हजार पाचशे चाळीस फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२१२५७४१८२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Sawairam Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e695ebef4b8a6c860bec48f3ef34f42f0c13f8d1aa06f854d5b9bd6874084124, serialNumber=bcaaf1242528ff3cdece2c8eb03929321c1c09c0a7c4d906e3b8a47677ad9769, cn=Suresh Sawairam Rathod
Date: 2018.07.02 13:00:53 +05'30'

**( सु. स. राठोड )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)

३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, सांगली.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली
६) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग,पुणे
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१,मुंबई.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र २, नागपूर
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सांगली
११) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१२) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
११) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग,सांगली.
१२) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी (कार्या-१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१५) निवडनस्ती कार्यासन पापु-१७.